**श्री. जितेंद्र लक्ष्मणराव भोपळे, सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-पकानि-१५१५/४५६/प्र.क्र.८५/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ०३ सप्टेंबर, २०१५.

**पहा :-** १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१२१२/७०९/प्र.क्र.१३७/नवि-२७, दि.२८.०८.२०१२.

२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यकारी आदेश क्र.आस्था/गट-अ/ससंनर/ना.नि./प्रशा-१/५१२४, दि.२९.०८.२०१२.

३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/जिलभो/ससंनर-प.का/प्रशा-१/०८, दि.२६.०२.२०१५ व समक्रमांक ४९, दि.२६.०६.२०१५.

**प्रस्तावना :-**

नगर विकास विभागाच्या **संदर्भ-१** येथील दि.२८.०८.२०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील तांत्रिक संवर्गातील रिक्त असलेली "सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदे नामनिर्देशनाने उपलब्ध झालेल्या उमेदवारांमधून भरण्याबाबत शासन आदेश निर्गमित करण्यात आले होते. त्यानुसार संचालनालयाच्या आस्थापनेवर पूर्वीपासून कार्यरत असलेले श्री.जितेंद्र लक्ष्मणराव भोपळे, तत्कालीन नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून "सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" (वेतनसंरचना रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.६,६००) पदावर दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीकरिता नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली आहे. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या **संदर्भ-२** येथील दि.२९.०८.२०१२ च्या कार्यकारी आदेशान्वये श्री. जि. ल. भोपळे, तत्कालीन नगर रचनाकार हे दि.३०.०८.२०१२ (म.पू.) रोजी ठाणे शाखा कार्यालय, ठाणे, जि. ठाणे येथील "सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" रिक्त पदावर नामनिर्देशनाने रुजू झाले होते.

**०२.** श्री. जि. ल. भोपळे, सहाय्यक संचालक, नगर रचना यांचा दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.३०.०८.२०१२ (म.पू.) पासून सुरु होऊन दि.२९.०८.२०१४ रोजी संपुष्टात येणे आवश्यक होते. तथापि, श्री. जि. ल. भोपळे, सहाय्यक संचालक, नगर रचना यांनी त्यांच्या परिविक्षा कालावधीत दि.१९.११.२०१२ ते दि.२३.११.२०१२ या ०५ दिवसांच्या कालावधीकरिता अर्जित रजा उपभोगलेली आहे. सबब, श्री .जि .ल .भोपळे, सहाय्यक संचालक, नगर रचना यांनी त्यांच्या परिविक्षा कालावधीमध्ये ०५ दिवसांची अर्जित रजा उपभोगली असल्याने त्यांचा परिविक्षा कालावधी ०५ दिवसांनी पुढे वाढून दि) ०३.०९.२०१४.म.नं (.रोजी संपुष्टात येईल.

**०३.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या **संदर्भ-३** येथील दि.२६.०२.२०१५ व दि.२६.०६.२०१५ च्या पत्रान्वये श्री. जि. ल. भोपळे, सहाय्यक संचालक, नगर रचना यांचा दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची "सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदावर नियमित नियुक्ती करण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

**०४.** सबब, श्री. जि. ल. भोपळे, सहाय्यक संचालक, नगर रचना यांचा दि.३०.०८.२०१२ (म.पू.) पासून सुरु झालेला दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची "सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदावर नियमित नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्री. जितेंद्र लक्ष्मणराव भोपळे, सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) हे "सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदाच्या सेवाप्रवेश नियमातील अटी व शर्तींची तसेच इतर सेवा विषयक बाबींची पूर्तता करित असून त्यांनी दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याने महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ ,मधील नियम , ३९अपवाद १ (ए) (दोन) मधील तरतुदीनुसार त्यांचा "सहाय्यक संचालक, नगर रचना" पदाचा दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.०३.०९. २०१४ (म.नं.) पासून संपुष्टात आणण्यात येत असून त्यांची "सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ /राजपत्रित)" (वेतनसंरचना रु.१५,६००-रु.३९,१००+ ग्रेड पे रु.६,६००) पदावर दि.०४.०९.२०१४ (म.पू.) पासून नियमित नियुक्ती करण्यात येत आहे.

**०२.** सदरचे आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०९४/१८३७/प्र.१८/९५/आठ, दि.२८ मार्च, १९९५ व सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दि.२५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१५०९०३१७३२०२३४२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam K Salimath

Digitally signed by Siddharam K Salimath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam K Salimath
Date: 2015.09.04 11:49:25 +05'30'

( एस. के. सालीमठ )

महाराष्ट्र शासनाचे उप सचिव.

**प्रति,**

श्री. जितेंद्र लक्ष्मणराव भोपळे, सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित), पुणे शाखा कार्यालय, पुणे यांना **(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)**

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२) महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई / नागपूर.
४) संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, तळ मजला, पुणे. **(०३-प्रती)**
५) सह संचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
६) सहाय्यक संचालक, नगर रचना, पुणे शाखा कार्यालय, पुणे.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / ठाणे.
८) निवडनस्ती / नवि-२७.

*****